**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता राष्ट्रीय छात्रसेना योजना (अनिवार्य) याकरीता २२०४-००१६ या लेखाशिर्षाअंतर्गत निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र:- राछासे २६२१/प्र.क्र.७६/क्रीयुसे-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०८ सप्टेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४.०६.२०२०
२) क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. राछासे/निधी मागणी/२०२१-२२/का-५/१२३४, दि. १४.०७.२०२१.
३) क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र. राछासे/निधी मागणी/२०२१-२२/का-५/१३६९, दि. २३.०७.२०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यातील राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी राष्ट्रीय छात्र सेना योजनेअंतर्गत (अनिवार्य) २२०४-००१६ या लेखाशिर्षाखालील उपशिर्ष ०६-दूरध्वनी, विद्युत व पाणीशुल्क, १३-कार्यालयीन खर्च, १४-भाडे पट्टी व कर, २१-पुरवठा व सामग्री याअंतर्गत मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी ६० टक्के प्रमाणे निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील राष्ट्रीय छात्रसेना कार्यालयांना सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी राष्ट्रीय छात्रसेना योजने अंतर्गत (अनिवार्य) २२०४-००१६ या लेखाशिर्षाखालील उपशिर्ष ०६-दूरध्वनी, विद्युत व पाणीशुल्क, १३- कार्यालयीन खर्च, १४- भाडे पट्टी व कर, २१-पुरवठा व सामग्री या उद्दीष्टांखाली मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी ६० टक्के प्रमाणे निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे रकाना क्र. ४ मध्ये नमूद केल्यानुसार निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**(रू. लाखात)**

| अ.क्र. | उपशिर्ष / उद्दीष्ट | मंजूर तरतूद | वितरीत करावयाची तरतूद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | उपशिर्ष ०६-दूरध्वनी, विद्युत व पाणीशुल्क, | रू. ७०.०० | रू. ४२.०० |
| २. | १३-कार्यालयीन खर्च, | रू. १००.०० | रू. ६०.०० |
| ३. | १४- भाडे पट्टी व कर, | रू. ८०.०० | रू. ४८.०० |
| ४. | २१-पुरवठा व सामग्री | रू. ९००.०० | रू. ५४०.०० |

२. वरील प्रमाणे वितरीत करण्यात आलेला निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनिस्त ठेवण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा-१०२, विद्यार्थ्यांसाठी युवक कल्याण कार्यक्रम (०१)(०१) राष्ट्रीय छात्रसेना (अनिवार्य) (२२०४-००१६)" या लेखाशिर्षाखालील संबंधीत उपशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. सदरचा निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

४. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या, शासन निर्णय, दि.२४.०६.२०२१ मधील आदेशांचे पालन करणे आवश्यक राहील. सदर निधीसाठी संबंधित समादेशक अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी व संबंधित विभागीय उपसंचालक (क्रीडा व युवक सेवा) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४३/२०२१/व्यय-५, दि. ०८/०९/२०२१ अन्वये व अर्थसंकल्प-८ च्या मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९०८१८०७०८३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2021.09.08 18:07:50 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री, (क्रीडा व युवक कल्याण) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, (क्रीडा व युवक कल्याण) मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. अतिरिक्त महासंचालक, राष्ट्रीय छात्रसेना संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई
९. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
१०. निवडनस्ती (क्रीयुसे-३).